# महाराष्ट्र विधानपरिषद

## तिसरे (हिवाळी) अधिवेशन, २०१८

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### महाराष्ट्रातील नगरपरिषदेच्या नगररचना व अतिक्रमण विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(१) ५९६ (२९-०१-२०१५). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्रातील नगर परिषदेच्या मंजूर कर्मचारी संवर्ग अधिनियम व मंजूर आकृतिबंधाप्रमाणे न.प. नगररचना व अतिक्रमण विभागात मोठ्या प्रमाणात पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासन निर्णयानुसार न.प.हद्दीत अतिक्रमण व अनधिकृत बांधकाम झाल्यास अधिकाऱ्यांवर फौजदारी गुन्हा दाखल करण्याबाबत तरतुद करण्यात आली, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, कायद्याच्या अंमलबजावणीसाठी रिक्त पदे भरण्यास शासनस्तरावर संबंधित प्राधिकरणाला निर्देश देण्यात आले, हे खरे आहे काय,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे कोणती ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१६-०५-२०१८) :** (१) होय.

(२) दिनांक २ मार्च, २००९ रोजीच्या शासन निर्णयानुसार अतिक्रमण व अनधिकृत बांधकाम या नागरी गुन्ह्याबाबत विहित मुदतीत नोटीस न

देणाऱ्या व पुढील कारवाई न केल्यास संबंधित अधिकाऱ्यास व्यक्तिश: जबाबदार धरुन कारवाई करण्याची तरतूद विहित केली आहे.

(३) शासन निर्णय दिनांक १३/०४/२०१७ अन्वये राज्यस्तरीय संवर्गातील एकूण ४५५ पदे नगररचना व मुल्य निर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरुन संबंधित संवर्गातील प्रतिनियुक्तीने भरण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

या निर्णयानुसार नगर परिषद प्रशासन संचालनालयास मंजूर पदांवर अधिकारी उपलब्ध करण्याबाबत महाराष्ट्र लोकसेवा आयोगास व गट क मधील कर्मचाऱ्यांबाबतीत शासनाच्या विहित कार्यपध्दतीनुसार पदे भरण्याचे कार्यवाही सुरु आहे. संबंधित निवड मंडळाकडून/लोकसेवा आयोगाकडून अधिकारी/कर्मचारी शिफारस करण्यात आल्यास नगर परिषदांमध्ये नगर रचना विषयक कामकाजाकरीता नेमणूका करण्याची तजवीज करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे कुंदे (ता.भिवंडी, जि.ठाणे) येथील ग्रुप ग्रामपंचायतीत अनियमितता झाल्याबाबत

**(२) १९८०१ (११-०८-२०१६). श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे कुंदे (ता.भिवंडी, जि.ठाणे) येथील ग्रुप ग्रामपंचायत अंतर्गत पाच वर्षाच्या कार्यकाळात झालेली अनियमितता व गैरव्यवहार यांची सुरु असलेली चौकशी पूर्ण झाली आहे काय,

(२) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व तद्‌नुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२६-०६-२०१८) :** (१) होय. चौकशी पूर्ण झाली आहे.
(२) व (३) सदर प्रकरणी चौकशी करण्यात आली असून चौकशीअंती ग्रामपंचायत, कुंदे येथील कारभारात अनियमितता आढळून आली आहे. सदर अनियमिततेस जबाबदार असलेले ग्रामसेवक श्री.गजानन इंगळे यांचेविरुध्द दिनांक २२/११/२०१६ रोजी ज्ञापन व विवरणपत्र बजावण्यात आले. दिनांक २/५/२०१७ रोजी शास्तीपूर्व कारणे दाखवा नोटीस बजावण्यात आली. त्याचप्रमाणे सदर प्रकरणी लेखी खुलासा सादर करणेबाबत दिनांक ९/५/२०१७ च्या पत्रान्वये कळविण्यात आले.

श्री.गजानन इंगळे यांनी अद्याप खुलासा सादर न केल्याने त्यांना एक शेवटची संधी म्हणून लेखी म्हणणे सादर करणेबाबत दिनांक २६/४/२०१८ रोजी कारणे दाखवा नोटीस बजावण्यात आली असून महाराष्ट्र जिल्हा परिषदा जिल्हा सेवा (शिस्त व अपील) नियम १९६४ मधील नियम ४(२) अन्वये श्री.गजानन इंगळे यांची दोन वेतनवाढ कायमस्वरूपी रोखण्याची शिक्षा देण्याची कारवाई प्रस्तावित करण्यात आली आहे.

---

## पंढरपूर पालखी मार्गावरील शाळेमध्ये स्वच्छतागृह बांधणेबाबत

**(३) २७१४९ (१५-०४-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) श्री क्षेत्र विठ्ठल रुक्मिणी मंदिर, पंढरपूर येथे दर्शनासाठी विविध राज्यातील कानाकोपऱ्यातून मोठ्या प्रमाणात दिंड्या दाखल होतात, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, ज्या पालखी मार्गावरून दिंड्या येतात त्यांचे मुक्काम शाळेत केल्याने त्यांच्यासाठी आवश्यक असणारी स्वच्छता गृहाची सुविधा या शाळांमध्ये उपलब्ध नाहीत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शाळांमध्ये स्वच्छता गृह बांधणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२९-०६-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) दिंड्या पालखी मार्गावरील शाळांमध्ये, वसतिगृहांमध्ये व इतर तत्सम ठिकाणी मुक्कामी असतात शासनस्तरावरुन प्रत्येक मुक्कामाच्या ठिकाणी आवश्यक तेवढे मोबाईल शौचालय उपलब्ध करुन दिले जातात. शाळांमध्ये विद्यार्थ्यांच्या पटसंख्येनुसार स्वच्छतागृह उपलब्ध आहेत. त्यापेक्षा जास्त शौचालयांकरीता निधी दिला जात नल्यामुळे सन २०१७ मध्ये शासनस्तरावरुन ७०० मोबाईल शौचालये आवश्यक अशा संबंधित ठिकाणी उपलब्ध केली होती.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील जलयुक्त शिवार योजना बोगस ठेकेदारांच्या ताब्यात दिल्याने पूर्ण क्षमतेने चालत नसल्याबाबत

**(४) २८४५८ (१५-०४-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामराव वडकुते, श्री.अनिल भोसले, श्री.आनंद ठाकूर, श्री.सतिश चव्हाण, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील जलयुक्त शिवार योजना बोगस ठेकेदारांच्या ताब्यात दिल्याने पूर्ण क्षमतेने चालत नसल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१७-०५-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

# यवतमाळ जिल्ह्यातील पांढरकवडा वन विभागात गैरव्यवहार झाल्याबाबत

**(५) ३११४८ (१८-०८-२०१७). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पांढरकवडा वन विभागात (जि.यवतमाळ) कोट्यवधीचा गैरव्यवहार झाल्याची तक्रार जनसेवक सेवा समितीने मा.मुख्यमंत्री यांच्याकडे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान केल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सुन्ना बिटातील अतिक्रमण काढण्यासाठी लाखो रुपयांचा प्रस्ताव दाखल करण्यात आला असून त्या जमिनीवर वृक्षारोपन करण्याची परवानगी मिळविण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन गैरव्यवहार करणाऱ्या दोषींवर व सदर ठिकाणाचे अतिक्रमण काढण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०७-०६-२०१८) :** (१) यवतमाळ जिल्ह्यातील पांढरकवडा उपवनसंरक्षक कार्यालयाच्या गैरकारभाराबद्दल आणि कोट्यवधी रुपयांच्या गैरव्यवहाराबाबत अध्यक्ष, जनसेवक सेवा समिती, पांढरकवडा यांच्याकडून मा.मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांच्याकडे दिनांक १/४/२०१७ रोजी तक्रार दाखल करण्यात आली आहे.

(२) पांढरकवडा वन विभागांतर्गत येत असलेले पांढरकवडा वनक्षेत्रातील मौजा सुन्ना येथील ग्रामस्थांनी कक्ष क्र.सी-१०४ मधील वन जमिनीवर ४२ हेक्टर परिसरातील अतिक्रमण केले असल्याने वनपरिक्षेत्र अधिकारी (वन विकास महामंडळ), उमरी यांनी प्रथम गुन्हा रिपोर्ट क्रमांक २६६३, २६६४, दिनांक १४/६/२००६ अन्वये वन गुन्हा दाखल केला. प्रकरणी वन विभागाने दिनांक ११/२/२०१७ पासून अतिक्रमण निर्मूलनाची कारवाई सुरु केली. सदर जागेवर एकूण २९ लोकांनी अतिक्रमण केले होते. अतिक्रमणाबाबत मा.न्यायालयातून तात्पुरते स्थगनादेश झाल्यामुळे ९ इसमांचे एकूण १८ हे.

क्षेत्र वगळून २४ हे. क्षेत्रावरील अतिक्रमण काढून रोपवनाचे पूर्व पावसाळी कामांसाठी रुपये ४४,९९,०००/- निधी प्राप्त झाला होता.
(३) व (४) मौजा सुन्ना बिटातील झालेल्या उपरोक्त कामाची विभागीय वन अधिकारी, यवतमाळ यांच्या मार्फत पहाणी/चौकशी केली असता अंदाजपत्रकानुसार कामे करण्यात आली असून यामध्ये अनियमितता झाल्याचे आढळून आले नाही.

---

## येवला, निफाड व नांदगाव (जि.नाशिक) तालुक्यातील नद्यांचे पुनरुज्जीवन करण्याबाबत

**(६) ३१४४३ (११-०८-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) जलयुक्त शिवार अभियानांतर्गत विविध योजनांचे अभिसरण करुन लोकसहभागाद्वारे राबविण्यात येत असलेला नदी पुनरुज्जीवन कार्यक्रम प्रभावीपणे राबविण्यासाठी येवला (जि.नाशिक) तालुक्यातील नारंदी व धामणी या नद्यांवर सिमेंट नाला बांध कार्यक्रम राबविण्याकरीता निधी मिळण्यासाठी नाशिकच्या जिल्हा प्रशासनाने दिनांक १५ मार्च, २०१६ रोजी वा त्यासुमारास शासनाकडे प्रस्ताव पाठविलेला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, जलयुक्त शिवाराच्या कामास निधी मिळण्याकरीता दिनांक २६ सप्टेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास स्थानिक लोकप्रतिनिधीनी शासनाकडे मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) तसेच येवला, निफाड व नांदगाव तालुक्यातील नद्यांचे पुनरुज्जीवन करण्यासाठी शासनाकडे प्रस्ताव पाठविण्याची स्थानिक लोकप्रतिनिधींनी दिनांक २२ जुलै, २०१७, दिनांक ११ नोव्हेंबर, २०१६ व दिनांक १२ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास नाशिकच्या जिल्हा प्रशासनाकडे मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नदयांचे पुनरुज्जीवन करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (२४-०५-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) नाशिक जिल्ह्यास जलयुक्त शिवार अभियान अंतर्गत सन २०१६-१७ व सन २०१७-१८ मध्ये अनुक्रमे रुपये ७८.३१ कोटी व ४१.२३ कोटी असा एकूण रुपये ११९.५४ कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे.

(३) होय, हे खरे आहे.

(४) शासनाचे दिनांक १८ ऑगस्ट, २०१७ चे पत्रान्वये नदी पुनर्जीवन कार्यक्रमांतर्गत नाला उपचार कामाबरोबरच क्षेत्र उपचाराची कामे प्रस्तावित करून शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनूसार सुधारीत प्रस्ताव सादर करण्याच्या सूचना जिल्हाधिकारी, नाशिक यांना देण्यात आल्या आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुण्यातील खडकवासला धरणात सांडपाणी सोडल्याने धरणातील पाणी दूषित झाल्याबाबत

**(७) ३२६२३ (०८-०८-२०१७). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुण्यातील खडकवासला धरणात मोठ्या प्रमाणावर मैलापाणी आणि सांडपाणी सोडले जात असल्याने धरणातील पाणी दूषित होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रश्नाबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार धरणात मैलापाणी आणि सांडपाणी सोडणाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१०-०७-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) संबंधित ग्रामपंचायतींना तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांनाही उपाययोजना व दक्षता घेण्याबाबत क्षेत्रिय अधिकारी जलसंपदा यांच्यामार्फत कळविण्यात आले आहे.

तसेच महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाला देखील या विषयी आवश्यक कार्यवाही करण्याच्या सूचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांमार्फत देण्यात आल्या आहेत.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सेनगांव तालुक्यातील (जि.हिंगोली) सिमेंट बंधाऱ्यावर दरवाजे बसविण्याबाबत

**(८) ३३१९३ (११-०८-२०१७). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सेनगाव तालुक्यातील (जि.हिंगोली) शासनस्तरावरुन पाणलोट विकास कार्यक्रम व जलयुक्त शिवार अभियानातून पाणी पातळीत वाढ व्हावी, पावसाळयात नदीनाल्याद्वारे वाहून जाणारे पाणी अडवावे, भूगर्भातील पाणी पातळी वाढून जलस्त्रोतांना पाणी उपलब्ध व्हावे या योजनेतून बहुसख्यांक नदी नाल्यावर पाणी अडविण्यासाठी सिमेंट बंधारे बांधण्यात आले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या बंधाऱ्यांवर पाणी अडविण्यासाठी दरवाजे बसविण्यात आले नसल्याने पावसाचे पाणी वाहून जात आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सिमेंट बंधाऱ्यावर दरवाजे बसविण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (२४-०५-२०१८) :** (१) होय.
(२) व (३) जिल्हा परिषद, हिंगोली अंतर्गत बांधलेले बंधाऱ्याचे गेट ग्रामपंचायत अथवा बंधाऱ्यांच्या काठावरील शेतकरी यांना हस्तांतरीत केले आहेत. नाल्यास पाणी असलेल्या काही ठिकाणी गेट टाकण्याची कार्यवाही संबंधित शेतकरी यांनी केली आहे.

द्वारयुक्त सिमेंट बंधाऱ्यावर ज्या ठिकाणी अद्याप गेट बसविलेले नाही तेथे गेट बसविण्याबाबत, संबंधित सरपंच / लाभधारक शेतकरी यांचेकडे पाठपुरवठा करण्यास्तव सूचना देण्यात आल्या आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रास्त भाव दुकानात मिळणारी साखर शासनाने बंद केल्याबाबत

**(९) ३४६५६ (१६-११-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील सुमारे ४५ लाख कुटुंबांना रास्त भाव दुकानात मिळणारी साखर दिनांक ५ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यादरम्यान शासनाने बंद केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त निर्णयामुळे ऐन सणासुदीच्या काळात सर्वसामान्य जनतेला साखरेपासून वंचित ठेवण्यात आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सामान्य जनतेच्या मागणीनुसार स्वस्त धान्य दुकानातून पुन्हा साखर देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच त्याबाबत केव्हापर्यंत निर्णय घेण्यात येणार आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (०४-०८-२०१८) :** (१) व (२) केंद्र शासनाच्या दिनांक २६ फेब्रुवारी, २०१५ च्या मार्गदर्शक सूचनेनुसार राज्यातील बी.पी.एल. व अंत्योदय कार्डधारकांना साखरेचे वाटप करण्यात येत होते.

आता केंद्र शासनाच्या दिनांक १२ मे, २०१७ च्या आदेशान्वये व दिनांक १ जून, २०१७ च्या मार्गदर्शक सूचनेनुसार फक्त अंत्योदय अन्न योजनेतील लाभार्थ्यांसाठीच प्रती कुटुंब प्रतिमाह १ किलो याप्रमाणे साखर वाटप करण्याचा निर्णय घेतला आहे.

सदर योजना ही केंद्र शासनाच्या अनुदानावर राबविण्यात येत असल्याने केंद्र शासनाच्या धोरणानुसार फक्त अंत्योदय अन्न योजनेतील लाभार्थ्यांनाच प्रती कुटुंब प्रतिमाह १ किलो याप्रमाणे साखर वाटप करण्यात येते.

(३) उपरोक्त धोरणानुसार माहे डिसेंबर, २०१७, जानेवारी व फेब्रुवारी, २०१८ या तिमाही कालावधीकरीता फक्त अंत्योदय अन्न योजनेतील लाभार्थ्यांना साखर वाटप करण्यासाठी दिनांक १५ व १६ नोव्हेंबर रोजी साखर खरेदीचा तिमाही ई-लिलाव पार पडलेला आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## यवतमाळ जिल्ह्यातील संगणक परिचालकांच्या मागण्यांबाबत

**(१०) ३४८७० (०२-०१-२०१८). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्ह्यात मागील सात वर्षापासून ग्रामपंचायतीच्या कार्यालयात संगणक परिचालकांच्या मागण्याबाबत परिचालकांचे काम बंद आंदोलन करण्यात आले असल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) तसेच संगणक परिचालकांना नियुक्ती मिळणे, थकीत मानधन, आपले सरकार केंद्रावर नियुक्ती इ. अनेक मागण्यांबाबत महाराष्ट्र राज्य संगणक परिचालकांनी काम बंद आंदोलन केले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२२-०६-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) होय.

(३) आपले सरकार सेवा केंद्र प्रकल्पांतर्गत केंद्र चालकांचे मानधन शासन परिपत्रक क्रमांक आसक-२०१७/प्र.क्र.३२/आपले सरकार कक्ष दिनांक ६ सप्टेंबर, २०१७ नुसार देयक संगणक प्रणालीव्दारे निश्चित करून सीएसपी-एसपीव्ही मार्फत अदा करण्यात येते. तसेच केंद्र चालकांच्या मागण्यांबाबत शासनस्तरावर वेळोवेळी बैठका घेऊन सर्व संबंधितांना आवश्यक ते निर्देश देण्यात आले आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वरवडे-परबवाडी (ता.कणकवली, जि.सिंधुदुर्ग) येथील बोअरवेलचे अतिरिक्त कनेक्शन काढण्याबाबत

**(११) ३४९२० (०२-०१-२०१८). ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक ३३०९८ ला दिनांक १ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वरवडे-परबवाडी (ता.कणकवली, जि.सिंधुदुर्ग) येथे सन २०१२ पूर्वी मंजूर असलेल्या बोअरवेलवर फक्त ३० नळजोडणीची क्षमता असताना ८० पेक्षा अधिक नळजोडणी कनेक्शन नियमबाह्यरित्या देण्यात आल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर मंजूर बोअरवेलवर फक्त ३० नळजोडणी एवढीच क्षमता असताना माहे फेब्रुवारी, २०१२ मध्ये या बोअरवेलवर ८० पेक्षा अधिक नळजोडणी कनेक्शन कोणत्या आधारे देण्यात आले, तसेच त्यास जबाबदार असणाऱ्यांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, सदर योजनेवरील वाढीव नळजोडणी कनेक्शनमुळे गावकऱ्यांना अल्प प्रमाणात पाणीपुरवठा होत असल्याच्या ग्रामस्थांच्या तक्रारी असताना सुध्दा योजनेमधून पाणीपुरवठा सुरळीत सुरु असल्याचे ग्रामपंचायतीमार्फत सांगण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन वरवडे-परबवाडी येथील बोअरवेलवरील अतिरिक्त सर्व कनेक्शन्स काढून योजना मुळ स्वरुपात कार्यान्वित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (२७-०७-२०१८) :** (१) हे खरे नाही.

वरवडे-परबवाडी (ता.कणकवली, जि.सिंधुदुर्ग) येथील विंधन विहीरीला पुरेसे पाणी उपलब्ध असल्याने विंधन विहिरीची क्षमता ४९६० लीटर प्रति तास असून ४० ली. प्रतिमाणशी प्रति दिवस याप्रमाणे ७९ नळ कनेक्शनला पाणीपुरवठा करणे शक्य आहे.

(२) अशी बाब नाही.

मौजे वरवडे-परबवाडी येथील विंधन विहिरीवरील लघु नळ योजनेतून सार्वजनिक नळ थांब्याद्वारे पाणीपुरवठा करण्यात येत होता. दिनांक ०१/०८/२००९ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार १०० % नळ जोडणी देणे अनिवार्य असल्याने ग्रामपंचायतीमार्फत नवीन साठवण टाकी बांधण्यात आली व ग्रामस्थांच्या मागणीनुसार सार्वजनिक नळथांबे बंद करुन ७९ वैयक्तिक नळ जोडण्या देण्यात आल्या असून सदर गावाची लोकसंख्या ३९५ इतकी आहे. सद्य:स्थितीत योजनेद्वारे पाणीपुरवठा सुरळीत सुरु आहे.

१४ व्या वित्त आयोगांतर्गत वरवडे-परबवाडी येथील विंधन विहीर दुरुस्त करणे व स्त्रोताचे पुनर्जिवन करणे या कामाच्या अंदाजपत्रकास दिनांक २७/०२/२०१८ रोजी तांत्रिक मान्यता देण्यात आली आहे. परंतु मंजूर असलेली विंधन विहिर खोदाई करणे या कामासाठी आवश्यक असणारी जागा अद्याप प्राप्त झालेली नाही. त्यामुळे निविदा प्रक्रिया झालेली नसून काम प्रलंबित आहे. जागा उपलब्ध झाल्यावर त्वरीत विंधन विहीर करण्यात येईल.

(३) हे खरे नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील महिला आर्थिक विकास महामंडळ अंतर्गत येणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या करार तत्वावरील न्याय मागण्याबाबत

**(१२) ३५३१६ (०२-०१-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील महिला आर्थिक विकास महामंडळ अंतर्गत येणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या करार तत्वावरील न्याय मागण्या निकाली काढण्याबाबत माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान लोकप्रतिनिधींनी शासनास निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सन १९९५ पासून कार्यरत असणारे अधिकारी व कर्मचारी यांना दरवर्षी १० टक्के मानधन वाढविणे दिनांक ५ फेब्रुवारी, २००७ च्या शासन निर्णयानुसार अपेक्षित असतांनाही देण्यात येत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२८-०६-२०१८) :** (१) होय.

(२), (३) व (४) तेजस्विनी कार्यक्रमाची अंमलबजावणी करताना करारत त्वावरील अधिकारी/कर्मचारी यांना शासन निर्णय क्र. मविम-२००२/प्र.क्र.१०६/का-१०, दिनांक ५/२/२००७ नुसार महामंडळाने सन २००८-०९, २००९-१० व २०१०-११ पर्यंत एकत्रित मानधनावर अनुक्रमे १०% वाढ दिली होती. त्यानंतर महामंडळातील नियमित सेवेती अधिकारी/कर्मचारी यांना सन २००८ मध्ये पाचवा वेतन आयोग लागू केल्यामुळे त्यांना मिळणारे वेतन व करारतत्वावरील अधिकारी/कर्मचारी यांना मिळणारे मानधन यांच्यात जवळ-जवळ ७५% ते १००% इतकी तफावत दिसून आल्यामुळे ही तफावत कमी करण्यासाठी महामंडळाने जुलै, २०१० मध्ये करारतत्वावरील

अधिकारी/कर्मचारी यांच्या एकत्रित मानधनात ५०% वाढ करुन मानधनाची रक्कम व नियमित सेवेतील अधिकारी कर्मचारी यांचे वेतन यांच्यामधील ५०% तफावत कमी करण्याचा प्रयत्न केला व सोबतच १०% वाढ देणे सुरु ठेवले.

सन २०१२ मध्ये नियमित सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांना सहावा वेतन आयोग लागू केल्यामुळे त्यांना मिळणारे वेतन व करारतत्वावरील अधिकारी/कर्मचारी यांना मिळणारे मानधन यामध्ये पुन्हा ७५% पर्यंत तफावत दिसू लागली. तेजस्विनी कार्यक्रमाच्या अंमलबजावणीमध्ये नियमित अधिकारी/कर्मचारी यांचेसोबत करारतत्वावरील अधिकारी/कर्मचारी यांची भूमिका महत्वाची असल्यामुळे नियमित व करारतत्वावरील अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व मानधनामधील तफावत कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी अडचणीची होवू लागली होती. ही बाब लक्षात घेवून दिनांक ४/९/२०१२ रोजीच्या तेजस्विनी राज्यस्तरीय शक्तीप्रदान समितीच्या बैठकीत तेजस्विनी कार्यक्रमांतर्गत कार्यरत असलेल्या करारतत्वावरील अधिकारी/कर्मचारी यांच्या मानधनामध्ये जानेवारी, २०१२ पासून ४०% वाढ करुन यापुढील प्रकल्प कालावधीपर्यंत मानधनात वार्षिक ३% वाढ करण्यात अंदाजपत्रकीय उपलब्ध तरतूदीच्या अधीन राहून मान्यता देण्यात आली होती त्यानुसार करारतत्वावरील अधिकारी/कर्मचारी यांना मानधनात आजपर्यंत दरवर्षी ३% वाढ देण्यात येत आहे.

---

## चपळगाव (ता.अक्कलकोट, जि.सोलापूर) येथील कुरनूर धरणावरील भौतिक सुविधांबाबत

**(१३) ३५६१५ (०२-०१-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चपळगाव (ता.अक्कलकोट, जि.सोलापूर) येथील कुरनूर धरणामध्ये ८२२ दशलक्ष घनफूट पाणी साठवणूक क्षमता आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यावर्षी भरपूर प्रमाणात पाऊस पडल्याने सध्या हे धरण १०० टक्के भरल्यामुळे अक्कलकोट तालुक्यातील अनेक शेतकऱ्यांना याचा फायदा शेतीच्या पाण्यासाठी होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या धरणावरून रस्ता गेल्याने रस्त्यावरून जाणाऱ्या प्रवाशांना धरणावरील अपुऱ्या भौतिक सुविधांमुळे त्रास सहन करावा लागत असून याबाबत स्थानिक नागरिकांकडून व वृत्तपत्रांमधून प्रशासनाचे लक्ष वेधण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१४-०६-२०१८) :** (१) होय.

(२) होय.

दिनांक १५/१०/२०१७ रोजी बोरी धरणामध्ये १०० % पाणीसाठा झालेला होता.

(३) हे खरे नाही.

बोरी धरणावरील रस्ता हा जलसंपदा विभागातील अधिकारी व कर्मचारी यांना केवळ धरणाच्या देखभाल दुरुस्ती व परिचलनासाठी वापरण्यासाठी आहे. या रस्त्याचा वापर सार्वजनिक वाहतूकीसाठी करणे अपेक्षित नाही.

अक्कलकोटहून मोटयाळ व सिंदखेड या गावांना पोहोचण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभाग व जिल्हा परिषद यांच्यामार्फत प्रस्तावित रस्त्याचे काम अपूर्ण असल्यामुळे मोटार सायकल, सायकल व माणसांचा कुरनुर धरणावरील रस्त्याचा अनधिकृतरित्या वापर करीत आहेत. बोरी धरणावरील रस्ता सध्या चांगल्या स्थितीत असून धरणावरील विद्युत दिवे बंद आहेत. सदर विद्युत दिवे दुरूस्त करून चालू करण्याचे काम प्रगती पथावर आहे.

याबाबत स्थानिक नागरिकांकडून व वृत्तपत्रामधून प्रशासनाचे लक्ष वेधण्यात आल्याचे आढळून आले नाही.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

# केंद्र शासनाच्या सहाय्याने सुरु असलेल्या पायाभूत सुविधा प्रकल्पाच्या सद्य:स्थितीबाबत

**(१४) ३६८२० (०२-०१-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **नियोजन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील रस्ते, वीज, सिंचन आणि वाहतूकीसारख्या पायाभूत सुविधांचे सर्वाधिक प्रकल्प केंद्र शासनाच्या माध्यमातून सुरु आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रकल्पांच्या खर्चासाठी केंद्र शासनाने राज्य शासनाला किती निधी दिला आहे वा केंद्र शासनाने त्यावर खर्च केला आहे,
(३) असल्यास, सदर प्रकल्प किती कालावधीत पूर्ण करण्याचे उद्दीष्ट आहे व त्यानुषंगाने सुरु असलेल्या कार्यवाहीची सद्य:स्थिती काय आहे ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (११-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) रस्ते विकासासाठी केंद्रीय मार्ग निधी योजनेंतर्गत एकूण रुपये ७५७५.१८ कोटी अंदाजित किंमतीची ९७६ कामे मंजूर करण्यात आली आहेत. त्यासाठी रुपये ३९८०.६३ कोटी एवढा निधी केंद्र शासनाकडून प्राप्त झाला आहे. निधीच्या उपलब्धतेनुसार रस्त्याची कामे पूर्ण करण्याचे नियोजन आहे.

राज्यातील शहरी भागात वीज क्षेत्रातील पायाभूत सुविधांसाठी एकात्मिक ऊर्जा विकास योजनेसाठी केंद्र शासनाने रुपये २३००.०० कोटीची योजना मंजूर केली असून त्यापैकी केंद्र शासनाच्या ६० % हिश्श्यापैकी रुपये ३००.५० कोटी रक्कम मार्च, २०१८ पर्यंत प्राप्त झाली आहे. ग्रामीण भागात वीज क्षेत्रातील पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी दीनदयाळ उपाध्याय ग्रामज्योती योजनेसाठी रुपये २१६४.१४ कोटीची योजना मंजूर असून त्यामधील केंद्र शासनाच्या ६० % हिश्श्याचा रुपये ३६४.३९ कोटी निधी केंद्र शासनाकडून प्राप्त झाला आहे. या दोन्ही योजना मार्च, २०१९ पर्यंत पूर्ण करावयाच्या आहेत.

प्रधानमंत्री कृषी सिंचाई योजनेंतर्गत राज्यातील २६ प्रकल्प पूर्ण करण्यात येणार आहेत. त्यासाठी केंद्र शासनाकडून सन २०१६-१७ व २०१७-१८ या कालावधीत रुपये ५२२.८७ कोटी एवढा निधी प्राप्त झाला असून नाबार्ड कडून रुपये ३१०६.४० कोटीचे कर्ज प्राप्त झाले आहे. सन २०१६-१७ मध्ये २६ पैकी ३ प्रकल्प पूर्ण झाले आहेत.

बंदरे विभागामार्फत सागरमाला कार्यक्रमांतर्गत प्रवासी वाहतुकीसाठी रुपये २४०.६६ कोटी किंमतीच्या ११ कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून केंद्र शासनाच्या ५०% हिश्श्यापैकी रुपये १०६.४५ कोटी निधी प्राप्त झाला आहे. ११ पैकी ३ कामे पूर्ण झाली आहेत. उर्वरीत कामे १८ महिन्यात पूर्ण करण्याचे उद्दिष्ट आहे.

परिवहन विभागांतर्गत महाराष्ट्र शासन व केंद्र शासन यांच्या आर्थिक सहभागातून (कॉस्ट शेअरींग)

(अ) अहमदनगर-बीड-परळी वैजनाथ

(ब) वर्धा-नांदेड-यवतमाळ-पुसद

(क) वडसा-देसाईगंज-आरमोरी-गडचिरोली हे तीन रेल्वे प्रकल्प राज्यात सुरु असून हे प्रकल्प अनुक्रमे सन २०२६, २०२३ व २०२० पर्यंत पूर्ण करण्याचे उद्दिष्ट आहे. या ३ प्रकल्पांसाठी केंद्राकडून रुपये १३२०.५५ कोटी इतका निधी उपलब्ध करण्यात आला आहे.

---

## चोपडा (जि.जळगाव) येथील युवतीवर बलात्कार प्रकरणाची चौकशी करणेबाबत

**(१५) ३६८३० (०४-०१-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चोपडा (जि.जळगाव) येथे युवतीवर जीवे मारण्याची धमकी देऊन बलात्कार झाल्याचा प्रकार निदर्शनात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकारातील आरोपीला गुन्हा दाखल करूनही अटक करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
(३) फिर्यादीने दिलेल्या तक्रारीवरून चोपडा शहर पो स्टे येथे भाग ५ गु.र.नं. ९५/२०१७ भा.दं.वि. क्र. ३७६, ३७६(न), ३२४, ४५२, ५०६ नुसार गुन्हा दाखल करण्यात येऊन आरोपीस अटक करण्यात आलेली आहे. गुन्ह्यातील आरोपी विरूध्द मा.न्यायालयात दोषारोप पत्र दाखल केलेले असून सद्य:स्थितीत गुन्हा न्यायप्रविष्ठ आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रुंज (ता.पुर्णा, जि.परभणी) येथील मद्यविक्रेत्याने मा.सर्वोच्च न्यायालयाने आदेशाचे उल्लंघन केल्याबाबत

**(१६) ३६९४० (०२-०१-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **राज्य उत्पादन शुल्क मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रुंज (ता.पुर्णा, जि.परभणी) येथील मद्यविक्रेत्याने राज्यात माहे मार्च, २०१७ नंतर मद्य विक्रीच्या परवान्यांचे नुतनीकरण न करण्याच्या मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशाचे उल्लंघन केले असून मद्य विक्री तक्त्यामध्ये सदर मद्यविक्रेत्याने माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान मद्यविक्री केल्याची नोंद असतांनाही राज्य उत्पादन शुल्क अधिकाऱ्यांनी त्यांच्यावर कारवाई न केल्याने परभणी येथील सामाजिक कार्यकर्त्याने जिल्हाधिकारी, परभणी यांच्याकडे लेखी तक्रार नोंदविली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने मद्यविक्रेता व जबाबदार संबंधित अधिकारी यांच्याविरूध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१९-०६-२०१८) :** (१) हे खरे आहे. अनुज्ञप्तीधारकाने नुतनीकरण शुल्क भरणा केलेले आहे. परंतु सदर अनुज्ञप्तीचे नुतनीकरण करण्यात आलेले नव्हते.

(२) सदर अनुज्ञप्तीचे व्यवहार बंद करण्यात आलेले आहेत. तसेच अनुज्ञप्तीधारकाच्या विनंती अर्जानुसार जिल्हाधिकारी, परभणी यांच्या मान्यतेने ता.पुर्णा जि.परभणी येथे सदर अनुज्ञप्ती स्थलांतर करण्यात आलेली आहे परंतु स्थानिक नागरिकांच्या विरोधामुळे सद्य:स्थितीत अनुज्ञप्ती बंद आहे.

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार प्रस्तुत अनुज्ञप्ती दिनांक ३१/०३/२०१७ रोजी बंद करणे आवश्यक असताना अनुज्ञप्ती बंद केली नाही. त्यासंदर्भात संबंधित दुय्यम निरीक्षक यांना कारणे दाखवा नोटीस देण्यात आली आहे. दुय्यम निरीक्षकाचा खुलासा प्राप्त झाला असून त्यावर कार्यवाही सुरू आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बोरीवली-दहिसर येथील श्रीकृष्ण नगर ते ओमकारेश्वर मंदिर या भुयारी मार्गास "ना-हरकत" प्रमाणपत्र देण्याबाबत

**(१७) ३७२२१ (०३-०१-२०१८). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बोरीवली-दहिसर श्रीकृष्ण नगर ते ओमकारेश्वर मंदिर असा भुयारी मार्ग हा पश्चिम द्रुतगती महामार्गावर प्रस्तावित असून त्यास सार्वजनिक बांधकाम विभागाकडून "ना-हरकत" प्रमाणपत्र प्राप्त झालेले नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने उक्त प्रस्तावित द्रुतगती महामार्गाकरीता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून "ना-हरकत" प्रमाणपत्र देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१३-०७-२०१८) :** (१) हे खरे नाही.

सदरील द्रुतगती मार्ग हा मुंबई महानगरविकास प्राधिकरणाकडे पाच वर्षाकरीता तात्पुरत्या स्वरुपात वर्ग करण्यात आला आहे. प्रश्नाधीन भुयारी मार्गाच्या प्रश्चिम द्रुतगती मार्गावरील सा.क्र. ५०५/८५० भाग हा मुंबई महानगरविकास प्राधिकरणाकडे आहे. मुंबई महानगरविकास प्राधिकरणाकडे हस्तांतरण करण्यापूर्वी प्रस्तावित केलेल्या भुयारी मार्गाच्या कामासाठी सा.बां.विभागाचे ना हरकत प्रमाणपत्र मिळण्याबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाला होता.

(२) सदर प्रस्तावावर या विभागाच्या अखत्यारीत असलेल्या पश्चिम द्रुतगती मार्गावरील सा.क्र. ५०५/८५० या ठिकाणी प्रस्तावित केलेल्या भुयारी मार्गाच्या ठिकाणी वाहतुक बेट आहे. याच ठिकाणी पूर्व बाजूस संजय गांधी राष्ट्रीय महामार्ग प्रवेशद्वार, पश्चिम बाजूस ओमकारेश्वर मंदिर असून वाहतुक जंक्शन सुध्दा आहे. प्रस्तावित ठिकाण नॅशनल पार्क उड्डाणपुलाचे पिलर्स अस्तित्वात आहेत. सदरच्या ठिकाणी अस्तित्वातील स्लीप लेन अरुंद असल्याने भुयारी मार्गाचे प्रवेशद्वार बांधणे अडचणीचे आहे. संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाचे प्रवेशद्वार व ओमकारेश्वर मंदिरासमोरील प्रचंड तसेच गुंतागुंतीची वाहतुकीच्या परिस्थितीच्या पार्श्वभुमीवर सदर ठिकाणी भुयारी मार्ग बांधणे संयुक्तिक होणार नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे देवडे (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथील काजळी नदी व अधिष्टी नदीचे पुनर्जीवन योजनेंतर्गत सिमेंट बंधारे बांधण्याबाबत

**(१८) ३७३११ (२९-११-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मृद व जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे देवडे (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथील काजळी नदी व अधिष्टी नदीचे पुनर्जीवन योजनेंतर्गत दगडांचा उपसा, रुंदीकरण व खोलीकरण करुन सिमेंट बंधारे बांधण्याबाबत मा.जलसंपदा व जलसंधारण राज्यमंत्री यांच्याकडे

दिनांक ९ जानेवारी, २०१६ रोजी वा त्यासुमारास लोकप्रतिनिधींनी पत्रव्यवहार करुनही कोणतीच कार्यवाही केली नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त पत्राच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, उक्त कामाची सद्य:स्थिती काय आहे ?

**प्रा. राम शिंदे (१८-०६-२०१८) :** (१), (२) व (३) मौजे देवडे येथील अधिष्ठी व काजळी नदीचा समावेश नदी पुनर्जीवन कार्यक्रमात केलेला नाही. तथापि, रत्नागिरी जिल्ह्यातील जगबुडी व अर्जुना या दोन नद्यांचा नदी पुनर्जीवन कार्यक्रमामध्ये समावेश करण्यात आलेला असल्याने या दोन नद्यांवरील सिमेंट बंधारे कामास नदी पुनर्जीवन कार्यक्रमांतर्गत मंजूरी देण्यात आलेली आहे.

---

## राज्यातील “क” व “ड” श्रेणीची बालगृहे रद्द करण्याच्या निर्णय घेतल्याबाबत

**(१९) ३७६०२ (१४-१२-२०१७). श्री.प्रविण दरेकर, श्री.हेमंत टकले, श्री.विक्रम काळे, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.ख्वाजा बेग, श्री.रामराव वडकुते, श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील ९६३ बालगृहांच्या तपासणींच्या आधारावर महिला व बालविकास विभागाने “क” व “ड” श्रेणीची २१४ बालगृहे रद्द करण्याचा निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, बालगृहांची मान्यता रद्द करताना बालगृहातील कर्मचाऱ्यांच्या पुनर्वसनाबाबत व मुलांच्या भविष्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा कारण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२०-०६-२०१८) :** (१) होय.

(२) बंद करण्यात आलेली २१३ बालगृहे वगळता महिला व बालविकास विभागाकडे ७५६३७ इतक्या मंजुर प्रवेशित क्षमतेची बालगृहे आहेत. सद्य:स्थितीत माहे डिसेंबर २०१७ अखेर २०६८३ एवढेच प्रवेशित बालगृहांमध्ये दाखल आहेत. त्यामुळे प्रवेश मिळणेस कोणत्याही अडचणी निर्माण झालेल्या नाहीत. तसेच सदर संस्था शासकीय नसल्याने कर्मचाऱ्यांच्या पुनर्वसनाबाबतचा प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळातील कर्मचाऱ्यांनी समान काम समान वेतन हया केलेल्या मागणीबाबत

**(२०) ३८०७२ (०४-०४-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळातील कर्मचाऱ्यांनी समान काम समान वेतन ही मागणी गेल्या अनेक वर्षापासून केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यापूर्वी काही कर्मचारी वर्गास कार्यरत नियुक्त पदाची वेतन श्रेणी देण्यात आली असून काही कर्मचारी वर्गास कार्यरत नियुक्त पदाची वेतनश्रेणी देण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) तसेच, मा.मुख्यमंत्री व मा.सामाजिक न्याय मंत्री हयांचे निर्देशानंतरही मागणी केल्यानंतर कर्मचारी वर्गास कार्यरत नियुक्त पदाची वेतनश्रेणी देण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने सहाव्या वेतन आयोगानुसार कर्मचारी वर्गास वेतनश्रेणी देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (२८-०६-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) हे खरे नाही.
(४) याबाबतचा प्रस्ताव तपासण्यात येत आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## परभणी तालुक्यातील शासकीय जमिनीवर अतिक्रमण झाल्याबाबत

**(२१) ३८४६५ (०५-०४-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक १६६७७ ला दिनांक १४ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी (जि.परभणी) शहरातील एकूण १४७ शासकीय सर्व्हे नंबर मधील एकूण क्षेत्र १४७६.२४ एकर क्षेत्राची चौकशी करण्यासाठी जिल्हाधिकारी, परभणी यांनी सन २०१६-१७ च्या दरम्यान अभिलेखे व स्थळ पहाणीचे काम करण्यासाठी अधिकारी व कर्मचारी यांच्या पथकाची नियुक्ती केली असून संबंधित पथकांनी विहित मुदतीत चौकशी करून आपला अहवाल जिल्हाधिकारी, परभणी यांच्याकडे सादर केला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर अहवालात काय निष्पन्न झाले, याबाबत थोडक्यात माहिती काय आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर जमीन ताब्यात घेण्याबाबत जिल्हाधिकारी यांच्यास्तरावरून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (३१-०८-२०१८) :** (१), (२) व (३) परभणी शहरामध्ये शासकीय जमीन म्हणून उल्लेख असलेल्या जुन्या गा.न.नं. ७/१२ मध्ये फेरफार होवून नोंदीमध्ये बदल कसे झाले याची तपासणी करण्याचे निर्देश जिल्हाधिकारी, परभणी यांनी उपविभागीय अधिकारी, परभणी यांना दिले

होते. त्यानुषंगाने उपविभागीय अधिकारी, परभणी यांनी परभणी शहरातील एकूण १४७ सर्व्हे नंबरचे शासकीय जमिनींचे अभिलेख तपासण्यासाठी व स्थळपाहणी चौकशी करण्यासाठी पथक गठीत केले होते. एकूण १४७ सर्व्हे नंबरमधून सार्वजनिक प्रयोजनार्थ प्रदान केलेल्या जमिनी, ईनाम जमीन रक्कम भरून खालसा केलेल्या जमिनी, कृषी विभागाच्या मालकीच्या जमिनी अशा एकूण २४ सर्व्हे नंबरमधील जमीन वगळण्याची विनंती उप विभागीय अधिकाऱ्यांनी जिल्हाधिकारी, परभणी यांना केलेली होती. त्यानुषंगाने सदरच्या जमिनी शासन ताब्यात घेतलेल्या नाहीत. उर्वरित १२३ सर्व्हे नंबर मधील जमिनी बाबतीत असलेले जुने अभिलेख तसेच ते विविध विभागाशी संबंधित असल्याने त्यांची पडताळणी करण्याचे काम गठीत समिती मार्फत सुरू आहे. समितीचा परिपूर्ण अहवाल प्राप्त झाल्यानंतर जिल्हाधिकारी, परभणी यांचेकडून पुढील कार्यवाही करणे अपेक्षित आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शिक्षकांना दोन वेतनवाढी देण्याबाबत

**(२२) ३८८०७ (०५-०४-२०१८). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत : दिनांक २० जुलै, २०१८ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक २ मधील प्रश्न क्रमांक २९५९० ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सन २००६-२००७ व २००७-२००८ या वर्षात ज्या शिक्षकांनी चांगली व उत्कृष्ट कामे केली आहेत त्यांना आदर्श शिक्षक पुरस्कार देण्यात आला असून वेतनवाढ देण्यात आली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शिक्षकांना दोन वेतनवाढी देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (३१-०७-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.

सन २००५-०६ ते २०१२-१३ या कालावधीमधील राज्य/राष्ट्रीय पुरस्कार प्राप्त शिक्षकांना शासन निर्णय दिनांक २५/१/२०१७ अन्वये दोन आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जंगलातून अवैधपणे फळांची झाडे व कंदमुळे नष्ट केल्यामुळे प्राणी शेतीचे नुकसान करीत असल्याबाबत

**(२३) ३८८९० (०४-०४-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जंगलातून अवैधपणे माकडे, हत्ती व हरणे यांना आवडणाऱ्या फळांची झाडे तोडल्यामुळे आणि डुकरांना आवडणारी कंदमुळे उत्खनन केल्यामुळे नष्ट झाली आहेत तसेच विदर्भातील शेतकऱ्यांच्या शेतावर वन्यप्राण्यांचा सांबर, चितळ, हरीण व रानडुकर या प्राण्यांच्या हैदोसामुळे गहु, हरभरा, ज्वारी व अन्य पिकांचे मोठ्या प्रमाणात नुकसान होत आहे, हे खरे आहे काय,

(२) तसेच, वन विभागाने या झाडांची व कंदमुळांची लागवड न केल्यामुळे हे प्राणी शेतातील धान, गहु, हरभरा, ज्वारी, हळद व अन्य पिकांचे व बागांचे नुकसान करीत आहेत तसेच शेतावर काम करण्यास जाणाऱ्या शेतमजुरांच्या जीवाला धोका निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या वन्यप्राण्यांचा कायमचा बंदोबस्त व्हावा याकरीता गावातील शेतकऱ्यांनी वन अधिकाऱ्यांकडे अर्ज करूनसुध्दा त्यावर कार्यवाही करण्यात आली नाही तसेच शेतकऱ्यांनी वन विभागाकडे सौर ऊर्जेचे कुंपण उपलब्ध करून देण्याची मागणी केली परंतु अद्यापपर्यंत ते उपलब्ध करून देण्यात आले नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने व शेतातील पिकांचे नुकसान होणाऱ्या शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्याबाबत तसेच सौर ऊर्जेचे कुंपण उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०७-०६-२०१८)** : (१) वन्यजीव (संरक्षण) अधिनियम, १९७२ मधील तरतुदींनुसार संरक्षित क्षेत्रामध्ये वृक्षतोड करण्यास प्रतिबंध आहे. तसेच राखीव वनात मंजूर कार्ययोजनेप्रमाणे जंगलातील फळझाडे राखीव ठेवण्यात येतात. जंगलातील फळझाडे तोडली जात नाहीत व जंगलामध्ये असलेल्या कंदमुळांचे उत्खनन करण्यात येत नाही.

वन्यप्राण्यांमुळे वनालगतच्या शेतपिकांच्या नुकसानीच्या घटना घडत असतात.

(२) वन्यजीव (संरक्षण) अधिनियम, १९७२ मधील तरतुदींनुसार संरक्षित क्षेत्रामध्ये कोणतीही वृक्षतोड करण्यात येत नाही. कार्ययोजनेच्या तरतुदींनुसार वनक्षेत्रातील फळझाडे वन्यप्राण्यांकरीता राखून ठेवण्यात येतात. तसेच नवीन लागवड करण्यात येणाऱ्या रोपवनात १० टक्के फळझाडे व कंदमुळे असलेल्या बांबूची लागवड करण्यात येते.

शेत परिसरात बिबट, वाघ, अस्वल, रानडुक्कर इत्यादींची भ्रमंती असताना त्यांचा शेतकऱ्यांशी/शेतमजुरांशी सामना झाल्यास शेतकरी/शेतमजुरांवर हल्ला होण्याच्या घटना घडत असतात.

(३) वन्यप्राण्यांमुळे शेतपिकांचे नुकसान टाळण्याकरीता खालीलप्रमाणे उपाययोजना करण्यात येतात :-

- शेतपीक नुकसान करणारे वन्यप्राणी निलगाय व रानडुक्कर यांना पारध करण्यासाठी शासन निर्णय दिनांक २२/०५/२०१५ अन्वये अटी सुलभीकरण करण्यात आलेले आहे.
- पीक व फळझाडाचे नुकसान झाल्यास शासन निर्णय दिनांक ०९/०७/२०१५ व २३/१२/२०१५ अन्वये नुकसान भरपाईच्या रकमेत वाढ करण्यात आलेली आहे.

- शेतपिकाचे नुकसान झाल्यास त्याची शहानिशा करणे, पंचनामा करणे, नुकसान क्षेत्राची मोजणी करणे, पुरावे तपासणे व नुकसनीचे मुल्य ठरविणे इत्यादी कार्यवाहीस होणारा विलंब टाळण्यासाठी व पंचनाम्यात सुलभता येण्यासाठी तसेच प्रत्यक्षात बाधित शेतकऱ्यांना देय अर्थसहाय्य तत्परतेने देणे शक्य व्हावे म्हणुन अवलंबविण्यात येणाऱ्या पध्दतीमध्ये सुधारणा शासन निर्णय दिनांक २८/०९/२०१५ अन्वये करण्यात आली आहे.
- पीक फळझाडाचे नुकसान प्रकरणात नुकसान भरपाईच्या तात्काळ अदा करण्याकरीता सदर विषय राज्य सेवा हक्क कायदयामध्ये समाविष्ट करून सेवा Online करण्यात आली आहे.
- वन्यप्राणी वनक्षेत्राच्या बाहेर येवू नये म्हणून वनक्षेत्रात त्यांना पिण्याकरीता पानवठे तयार करण्यात आलेले असून जलसंधारण व मृद संधारणाची कामे हाती घेण्यात येतात.
- विविध योजनेंतर्गत कुरण विकासाची कामे करण्यात येतात.
- वन्यप्राणी उन्हाळयामध्ये पिण्याच्या पाण्याच्या शोधात नागरी वस्त्याकडे फिरकु नये व त्यान्वये अवैध शिकारीस वाव मिळू नये यासाठी त्यांना वनातच पिण्यांचे पाणी उपलब्ध व्हावे यासाठी वनतलाव / खोदतळे बांधणे, कृत्रिम पाणवठे (सिमेंट टाके बांधणे) इत्यादी कामे करण्यात आले आहेत.
- डॉ.श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन योजना, DPDC, व्याघ्र प्रकल्प प्रतिष्ठान या योजनेंतर्गत शेतकऱ्याने अर्ज केल्यास त्यास वैयक्तिक व सामुहिकस्तरावर सौर कुंपन/चेनलिंक फेन्सिग उभारण्यास अर्थ सहाय्य करण्याची तरतुद करण्यात आली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

## मराठवाड्यात जंगलांचा विस्तार करण्याबाबत

**(२४) ३८९०६ (०४-०४-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मराठवाड्यात फक्त ४.७४ टक्के इतके कमी जंगल असून जंगलांचा विस्तार ३३ टक्के इतका करण्यासाठी लोकप्रतिनिधींनी दिनांक ११ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास मा.मुख्यमंत्री यांना निवेदन दिले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, निवेदनातील तक्रारींचे आणि उपायांचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१४-०६-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## क्रांतिसूर्य ज्योतिराव फुले फोरमनने पुणे येथे महारॅली काढल्याबाबत

**(२५) ३९००७ (०४-०४-२०१८). श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्रीमती हुस्नबानू खलिफे, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे येथे मुलींची पहिली शाळा असलेला भिडेवाडा, राष्ट्रीय स्मारक करावे, महात्मा ज्योतीबा फुले आणि ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले यांना संयुक्तरित्या भारतरत्न पुरस्कार द्यावा, म.फुलेंचे समग्र साहित्य पुन-प्रकाशित करावे, ओबीसींची जनगणना घोषित करावी या मागण्यांसाठी क्रांतिसूर्य ज्योतिराव फुले फोरमने पुणे येथे महारॅली काढली असल्याचे दिनांक २ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने महारॅलीच्या माध्यमातून केलेल्या मागण्यांवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१७-०७-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

तथापि, फुले दाम्पत्यांना अभिवादन करण्यासाठी व त्यांच्या सन्मानार्थ अखिल भारतीय माळी महासंघ, पुणे यांचेमार्फत दिनांक १ जानेवारी, २०१८ रोजी महारॅलीचे आयोजन करण्यात आले होते.

(२) सदर महारॅली भिडेवाडा ते महात्मा फुले वाडा व तेथून पुढे सावित्रीबाई फुले स्मारक, भवानी पेठ, पुणे या ठिकाणी जाऊन विसर्जित झाली. सदर महारॅलीचे आयोजन फुले दाम्पत्यांना अभिवादन करण्यासाठी व त्यांच्या सन्मानार्थ करण्यात आले असल्यामुळे संयोजकांनी शासनाच्या कोणत्याही विभागास मागण्यांचे निवेदन सादर केलेले नाही. त्यामुळे शासनाकडून कार्यवाही करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## प्रधानमंत्री व मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेतील सर्व कंत्राटी कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत कायम करण्याबाबत

**(२६) ३९०८७ (०४-०४-२०१८). डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाच्या प्रधानमंत्री व मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेतील सर्व कंत्राटी कर्मचाऱ्यांनी त्यांना शासकीय सेवेत कायम करण्याबाबत माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान मागणी केली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त योजनेतील कंत्राटी कर्मचाऱ्यांनी मागणी करूनही याबाबत कोणतीच कार्यवाही झाली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कंत्राटी कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत सामावून घेण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२२-०६-२०१८) :** (१) प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेसाठी महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेंतर्गत निर्माण करण्यात आलेल्या पदांपैकी कंत्राटी तत्वावर भरण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांनी शासकीय सेवेत कायम करण्यासाठी हायकोर्ट, मुंबई तसेच खंडपीठ औरंगाबाद व नागपूर येथे अनुक्रमे याचिका क्र. ४४७८/२०१५, ४९९२/२०१५ व ४४१८/२०१६ अन्वये दावा दाखल केला असून सद्यःस्थितीत सदर याचिका न्यायप्रविष्ट आहेत.
(२), (३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## येवला (जि.नाशिक) तालुक्यातील अवर्षणप्रवण क्षेत्रामध्ये देवदरी, खरवंडी व देशमाने येथे जलसंधारणाची कामे हाती घेण्याबाबत

**(२७) ३९२४८ (०४-०४-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) येवला (जि.नाशिक) तालुक्यातील अवर्षणप्रवण क्षेत्रामध्ये देवदरी, खरवंडी व देशमाने येथे जलसंधारणाची कामे हाती घेण्यासाठी लोकप्रतिनिधींनी दिनांक १७ ऑक्टोबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास लघुसिंचन विभाग नाशिक यांचेकडे पत्राद्वारे मागणी केली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०७-०६-२०१८) :** (१) होय.
(२) सदर तीनही योजनांचे प्राथमिक सर्वेक्षण करण्यात आलेले असून या योजना प्रचलित आर्थिक मापदंडात बसत नाहीत.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर शासकीय रुग्णालय परिसरात कोट्यवधी रुपये खर्च करुन ट्रामा सेंटर युनिट बांधण्यात आल्याबाबत

**(२८) ३९२७७ (०४-०४-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर शासकीय रुग्णालय परिसरात कोट्यवधी रुपये खर्च करुन ट्रामा सेंटर युनिट बांधण्यात आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, हया ट्रामा सेंटरमध्ये किती डॉक्टर, अधिकारी व कर्मचारी वृंद कार्यरत आहेत, तसेच तेथे कोणत्या उपकरणाची स्थापना केली आहे,
(३) असल्यास, रक्त संकलन केंद्र, स्टरलायझेशन युनिट, व्हॅस्कुलर सर्जन व अपघाती रुग्णांवर उपचाराकरीता यंत्र सामुगी उपलब्ध आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०९-०७-२०१८) :** (१) होय.
(२) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेशी संलग्नित प्रधानमंत्री स्वास्थ सुरक्षा योजनेंतर्गत (PMSSY-I) लेव्हल - १ चे ट्रामा केअर सेंटर कार्यान्वित झाले आहे. सदर ट्रामा केअर सेंटरकरीता वर्ग १ ते ३ - १३६ पदे, विद्यार्थी पदे-११, वर्ग ३ ची काल्पनीक पदे (तांत्रिक)

- ३३ पदे अशी १८० पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर १८० पदांपैकी वर्ग १ ते ३ ची ११९ पदे सद्य:स्थितीत कार्यरत आहेत. तसेच वर्ग ४ च्या सेवा बाहयस्त्रोतामार्फत घेण्यास परवानगी दिली आहे.

सदर ट्रामा केअर सेंटर मध्ये सीटीस्कॅन, एमआरआय, व्हेंटिलेटर, मल्टीपॅरा मिटर विथ सेंट्रल मॉनिटरींग सिस्टीम, डीफीबीलेटर, व्हिडिओ लॅरिंन्गोस्कोप, स्टरलायझेशन युनिट, अद्ययावत शस्त्रक्रियागृह उपलब्ध आहेत.

(३) होय.

(४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईत आंतरराष्ट्रीय वित्तीय केंद्र (आयएफएससी) उभारण्याबाबत

**(२९) ३९६८४ (०६-०४-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, डॉ.सुधीर तांबे, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.जनार्दन चांदूरकर, आर्कि.अनंत गाडगीळ, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.मोहनराव कदम : तारांकित प्रश्न क्रमांक २७८४४ ला दिनांक ३० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईत जगातील सर्व कंपन्यांची मुख्य कार्यालये असल्यामुळे याठिकाणी आंतरराष्ट्रीय वित्तीय केंद्र (आयएफएससी) उभारण्याच्या दीर्घ काळापासून राज्य शासनाच्या विचाराधीन असलेल्या प्रस्तावावर निर्णय घेण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त निर्णयाचे स्वरुप काय आहे व तद्‌नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०६-२०१८) :** (१), (२) व (३) होय. वांद्रे-कुर्ला संकुलामध्ये जागतिक वित्तीय सेवा केंद्राच्या विकासाची योजना व त्यावर देखरेख ठेवण्यासाठी तसेच केंद्र शासनासोबत समन्वय साधण्यासाठी राज्य शासनाने दिनांक ३ डिसेंबर, २०१५ अन्वये केंद्रीय वित्त राज्यमंत्री, भारत सरकार यांच्या अध्यक्षतेखाली सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने कार्य दलाची स्थापना केली आहे. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने वांद्रे-कुर्ला संकुलामध्ये जागतिक वित्तीय सेवा केंद्र उभारण्यासाठी आराखडा व अर्बन डिझाईन मार्गदर्शक तत्वे तयार करण्यासाठी मेसर्स टाटा कन्सल्टन्सी इंजिनिअर्स लिमिटेड व मेसर्स टाऊन लॅण्ड कन्सल्टन्ट (हाँगकाँग) यांच्या संयुक्त उपक्रमाची दिनांक २७ डिसेंबर, २०१६ रोजी नेमणूक केली आहे. सदर ठिकाणी विशेष आर्थिक क्षेत्र मान्य करुन त्यावर जागतिक वित्तीय सेवा केंद्र स्थापन करण्यास मंजूरी देण्याबाबत केंद्र शासनाकडे पाठपुरावा करण्यात येत आहे. या संदर्भातील मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाचा प्रस्ताव शासनाच्या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने दिनांक २२/०२/२०१७ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनाच्या वाणिज्य मंत्रालयाकडे औपचारिक मान्यतेसाठी सादर केलेला आहे.

---

## सोनूर्ली (ता.कोरपना, जि.चंद्रपूर) येथील पाटबंधारे विभागाने निवासाकरीता बांधलेल्या सदनिकेबाबत

**(३०) ३९८०० (०४-०४-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोनूर्ली (ता.कोरपना, जि.चंद्रपूर) येथील पाटबंधारे विभागाने पकडीगडम धरण प्रकल्पाकरीता सन १९९०-९२ मध्ये अधिकाऱ्यांच्या निवासाकरीता बांधलेल्या सदनिकेमध्ये गेल्या अनेक वर्षापासून कोणीही रहात नसल्याची बाब माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या सदनिकांमध्ये कोणीही रहात नसल्याने शासनाचा लाखो रुपयांचा खर्च वाया गेला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या सदनिकांचा वापर झाल्यास त्या सुस्थितीत राहतील याकरीता त्याभाड्याने द्याव्यात अशी मागणी स्थानिकांकडून होत आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१४-०६-२०१८) :** (१) होय.
(२) हे खरे नाही.
तथापि, सिंचन व्यवस्थापनेसाठी पुरेसा कर्मचारी वर्ग उपलब्ध झाल्यास भविष्यात सदर सदनिकांचा उपयोग होणार आहे.
(३) सदनिका भाड्याने देण्याबाबत कोणतीही मागणी क्षेत्रिय कार्यालयास प्राप्त नाही.
(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रायगड जिल्हा परिषदेच्या स्वनिधीतील कृषी व पशुसंवर्धन विभागाचा निधी अखर्चित असल्याबाबत

**(३१) ३९९२५ (०४-०४-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रायगड जिल्हा परिषदेच्या स्वनिधीतील कृषी व पशुसंवर्धन विभागाच्या १६ प्रकारच्या वैयक्तिक लाभ योजनांचा निधी अखर्चित असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त निधी वेळेत खर्च करण्यासाठी शासनाने कोणत्या उपाययोजना केल्या वा करण्यात येत आहेत,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०५-०७-२०१८) :** (१) होय.
(२) कॅशलेस ने खरेदी करण्याची अट शिथिल करण्यात आलेली आहे. तसेच निधीचे पुनर्विनियोजन करण्यात आलेले असून निधी वेळेत खर्च केला जातो.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कोल्हापूर जिल्हयात वृक्ष लागवडीमध्ये गैरव्यवहार झाल्याबाबत

**(३२) ३९९४७ (०४-०४-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सन २०१७ मध्ये वा त्यादरम्यान कोल्हापूर जिल्हयात शासनाने वृक्ष लागवडीसाठी किती निधी उपलब्ध करुन दिला तसेच सदर वृक्ष लागवडीमध्ये मोठ्या प्रमाणात गैरव्यवहार झाला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१९-०६-२०१८) :** (१) कोल्हापूर जिल्हयासाठी वृक्ष लावगड कार्यक्रमांतर्गत रुपये १ कोटी, २३ लाख ८४ हजार ८८४/- इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला होता. सदर कामामध्ये गैरव्यवहार झाल्याबाबत दिनांक ८ व ९ डिसेंबर, २०१७ रोजी “झी चोवीस तास” या मराठी वृत्तवाहिनीवर बातम्या प्रसारित झालेल्या होत्या,
(२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मुख्यालय) सामाजिक वनीकरण, पुणे यांनी दिनांक २८ व दिनांक २९ डिसेंबर, २०१७ रोजी तक्रारीमध्ये नमूद

रोपवन कामांना भेटी देऊन वस्तुस्थितीची पाहणी केली व प्राथमिक चौकशीमध्ये दोषी आढळून आलेल्या संबंधित वनक्षेत्रपाल, वनपाल व वनरक्षक यांना निलंबित करण्यात आले असून त्यांच्याविरुध्द म.ना.से. (शिस्त व अपिल) नियम १९७९ मधील नियम ८ अंतर्गत शिस्तभंगविषयक कार्यवाही सुरु करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील ५ हजार गावे दुष्काळ मुक्त करण्यात येत असल्याबाबत

**(३३) ३९९६९ (०४-०४-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील शेतकरी, शेतमजुर, सर्वसामान्य तसेच शासकीय यंत्रणांनी एकत्रितपणे काम केल्यामुळे मागील ३ वर्षात ११ हजार गावे जलपरिपूर्ण झाली असून या वर्षी आणखी ५ हजार गावे दुष्काळ मुक्त होणार असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पुढील दोन वर्षात राज्य दुष्काळ मुक्त करु अशी घोषणा मा.मुख्यमंत्री यांनी राज्यस्तरीय जलमित्र पुरस्कारांच्या वितरण समारंभामध्ये केली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, त्याचे थोडक्यात स्वरुप काय,
(४) असल्यास, त्यानुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०८-०६-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.
(३) व (४) टंचाई मुक्त महाराष्ट्र - २०१९ जलयुक्त शिवार अभियान अंतर्गत टप्प्याटप्प्याने २५००० गावे टंचाई मुक्त करण्याचे धोरण निश्चित करण्यात आले आहे.

---

## अमळनेर तालुक्यातील विद्युतीकरणाचा प्रस्ताव निधी अभावी प्रलंबित असल्याबाबत

**(३४) ४०१८८ (०४-०४-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **नियोजन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अमळनेर तालुक्यातील ग्रामीण भागातल्या वाढीव वस्तीतील विद्युतीकरणाचा प्रस्ताव जळगांव जिल्हा नियोजन समितीकडे निधी अभावी प्रलंबित आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जिल्हा नियोजन समितीने सदर लेखाशिर्षांतर्गत आवश्यक निधीची तरतूद केली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व प्रस्ताव मंजुर होणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२०-०६-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०१७-१८ अंतर्गत "२८०१-ऊर्जा" या योजनेसाठी रुपये ४००.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पिय तरतुद करण्यात आली होती. सदर तरतूदीमधून मागील अनुशेषची रक्कम रुपये ११३.०६ लक्ष वजा जाता नवीन कामांना प्रशासकीय मान्यतेसाठी उपलब्ध तरतूद रुपये २८६.९४ लक्ष इतकी होती. नवीन कामाकरीता उपलब्ध रुपये २८६.९४ लक्ष तरतूदीमधून अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादीत, जळगाव यांनी प्रस्तावित केल्यानुसार नवीन कामांना प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. तसेच, पुनर्विनियोजनाद्वारे नवीन रोहित्र खरेदी करण्यासाठी रुपये ७५.०० लक्ष अतिरिक्त निधी जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०१७-१८ अंतर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## फाफोरे (ता.अमळनेर) व कोळपिंप्री (ता.पारोळा, जि.जळगांव) येथील बोरी नदीवरील बंधारे बांधकामासाठी निधी उपलब्ध होणेबाबत

**(३५) ४०२१८ (०४-०४-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) फाफोरे (ता.अमळनेर) व कोळपिंप्री (ता.पारोळा, जि.जळगांव) येथील बोरी नदीवरील बंधारे बांधकामाचा प्रस्ताव व अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेसाठी जिल्हाधिकारी, जळगांव यांच्याकडे सादर करण्यात आल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रस्तावास जिल्हाधिकारी यांच्यामार्फत प्रशासकीय मान्यता कधीपर्यंत देण्यात येणार आहे, तसेच सदर बंधारे बांधकामास निधी उपलब्ध करणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१९-०६-२०१८) :** (१) होय.
(२) सदर प्रस्तावाची अंदाजपत्रके जिल्हा नियोजन समितीकडे प्रशासकीय मान्यतेसाठी सादर करण्यात आली होती. नियोजन विभागाच्या सूचनेनुसार मृद व जलसंधारण विभागाच्या सन २०१७-१८ च्या दरसुचीनुसार या कामांची सुधारीत अंदाजपत्रके तयार करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बोईसर (ता.जि.पालघर) येथील आदिवासी श्रमिक महिला मंडळ यांनी दारुबंदी घोषित करण्याची मागणी केल्याबाबत

**(३६) ४०२३२ (०४-०४-२०१८). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बोईसर (ता.जि.पालघर) येथील आदिवासी श्रमिक महिला मंडळ यांनी दिनांक १२ ऑगस्ट, २०१६ रोजी सर्व प्रकारची दारुबंदी घोषित करण्याची मागणी ग्रामपंचायतीकडे केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या ग्रामसभेत दारुबंदीवर चर्चा होवुन सर्व संमतीने मद्यविक्री परवानाचे नुतनीकरण न करणे व ना हरकत प्रमाणपत्र न देणे यासाठी करण्यात आलेल्या ठरावांचे पालन न करता चुकीचा ठराव लिहुन मद्य व्यवसायिकांच्या फायद्याचे धोरण राबवित आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर ग्रामपंचायत आदिवासी उपाययोजना क्षेत्रात असताना दारुबंदीचा ठराव जिल्हाधिकारी, पालघर व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क व दारुबंदी विभागाकडे पाठविणे बंधनकारक असतानाही तो पाठविण्यात आला नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाकडे या सर्व बाबींचा अहवाल प्राप्त झाला आहे काय,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संबंधित ग्रामसेवक, सरपंच व संबंधित पदाधिकारी यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२६-०६-२०१८) :** (१) होय हे खरे आहे.

(२) हे खरे नाही.

(३) होय, हे खरे आहे.

ग्रामपंचायत हद्दीमध्ये दारूबंदी घोषित करणे/ अनुज्ञप्ती परवानगी याबाबत मुंबई दारुबंदी (ग्रामसभा ठराव पारित केल्यामुळे अथवा नगरपरिषद/ महानगरपालिकेच्या वॉर्डातील मतदारांनी निवेदन दिल्यामुळे अनुज्ञप्ती बंद करणे) आदेश २००८ नुसार विहित निकष/कार्यपध्दती नुसार कार्यवाही झाली नसल्याने ठराव जिल्हाधिकारी, पालघर, अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क व दारुबंदी विभागाकडे पाठविण्यात आला नाही.

(४) नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## विदर्भाच्या ग्रामीण भागातील सिंचनास पर्याय असलेल्या मामा तलावांच्या पुनर्विकासाबाबत

**(३७) ४०२७५ (०४-०४-२०१८). डॉ.परिणय फुके, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सात हजार मामा तलावांचा पुनर्विकास प्रलंबित असल्याबाबतचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, विदर्भाच्या ग्रामीण भागातील सिंचनास पर्याय असलेल्या मामा तलावांचे पुनर्विकास होण्यासाठी केळकर समितीने शिफारस केली होती, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, नागपूर, चंद्रपूर, गोंदिया, भंडारा व गडचिरोली या भागातील १ लाख २५ हजार ९८६ हेक्टर शेतीच्या सिंचनास पर्याय असलेल्या मामा तलावांचे पुनर्विकास होणे आवश्यक असतांना निधीअभावी प्रलंबित ठेवण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने लाभक्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत संकल्पना लागू करून पुनर्विकास आराखडा तयार केलेला असतांना विकास कामे पूर्ण न झाल्याने सदर मामा तलावांच्या जमिनींवर अतिक्रमण होवून पाणी साठवणुकीची क्षमता कमी होत आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, आवश्यक असतांनाही शासनाने सदर विकास कामांवर निधी उपलब्ध न करण्याची सर्वसाधारण कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१९-०६-२०१८) :** (१) व (२) होय, हे अंशत: खरे आहे.

(३) नाही. मामा तलावांच्या पुनर्विकास कामाकरीता पुरेसा निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे.

(४) नाही.

(५) मामा तलावांच्या पुनर्विकास कामाकरीता शासनाकडून पुरेसा निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. त्यामुळे प्रश्नच उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील शासनाच्या वीज कंपन्यांमधील कर्मचाऱ्यांच्या मागण्यांबाबत

**(३८) ४०३३८ (०५-०४-२०१८). आर्कि.अनंत गाडगीळ** : सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शासनाच्या तीनही वीज कंपन्यांनी देशात अपयशी ठरलेले फ्रेंन्चाइजी धोरण राबविण्याचा निर्णय घेतला असल्याने संबंधित कर्मचारी व ग्राहकांना त्रास सहन करावा लागणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महापारेषण कंपनीमध्ये स्टाफ सेट अपच्या नावाखाली अभियंत्यांची ६५० पदे भरणे, त्यांच्या नियमबाह्य पध्दतीने बदल्या करणे तसेच महावितरण कंपनी कर्मचाऱ्यांकडून सुट्टीच्या दिवशीही काम करुन घेत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त अन्यायाच्या विरोधात व इतर मागण्यासांठी या कंपन्यांमधील अधिकाऱ्यांनी दिनांक ५ जानेवारी, २०१८ रोजी भ्रमणध्वनी बंद आंदोलन केले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने अभियंत्यांच्या मागण्या मान्य करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२६-१०-२०१८)** : (१) ज्या विभागांत वीजेच्या गळतीचे प्रमाण जास्त व वीज देयक वसुलीचे प्रमाण कमी आहे आणि वितरण प्रणालीमध्ये सुधारणा करण्याची आवश्यकता आहे अशा निवडक भागात महावितरण कंपनीद्वारा शासनाच्या निर्देशांनुसार फ्रॅन्चाइझी नियुक्त करण्यात येते.

(२) महापारेषण कंपनीने सुधारीत प्रशासकीय रचनेची अंमलबजावणी करताना उद्भवणाऱ्या मुद्यांचे परिक्षण करण्याकरिता निवारण समिती स्थापन केलेली आहे. याच्या नावाखाली कोणत्याही अभियंत्याची बदली केलेली नाही. वीज ग्राहकांना ग्राहकाभिमुख सेवा देण्याकरीता महावितरण कंपनीच्या अत्यावश्यक सेवेमध्ये कर्मचारी कार्यरत आहेत. अखंडीत वीज पुरवठा सुरळीत ठेवण्यासाठी अशा कर्मचाऱ्यांकडून प्रसंगी सुट्टीच्या दिवशीही कामे करुन घेतली जातात.

(३) हे खरे आहे. सबऑर्डिनेट इंजिनिअर्स असोसिएशन या अभियंत्यांच्या

संघटनेने त्यांच्या काही राज्यस्तरीय मागण्या/प्रश्नांसंदर्भात दिनांक ०५/०१/२०१८ रोजी भ्रमणध्वनी सिमकार्ड जमा करण्याचे आंदोलन केले होते.
(४) व (५) सबऑर्डिनेट इंजिनिअर्स असोसिएशन या अभियंत्यांच्या संघटनेच्या राज्यस्तरीय पदाधिकाऱ्यांच्या महावितरण आणि महापारेषण या कंपन्यांसोबत माहे जानेवारी, २०१८ मध्ये बैठका झाल्या. सदर बैठकांमध्ये झालेल्या सकारात्मक चर्चेनंतर अभियंत्यांनी त्यांचे आंदोलन मागे घेतले.

---

## यवतमाळ जिल्ह्यातील विकास आराखड्याच्या प्रस्तावाबाबत

**(३९) ४०४०९ (०४-०४-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **नियोजन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) यवतमाळ जिल्ह्यातील अनेक विभागांचे ९४० कोटी रुपयाच्या विकास आराखड्याचे प्रस्ताव पाठविले असता जिल्हा नियोजन विभागाने केवळ ३६९ कोटी रुपयाचे प्रस्ताव शासनाकडे दिनांक २४ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास पाठविले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने यवतमाळ जिल्ह्याचा पूर्ण क्षमतेने विकास व्हावा म्हणून अनेक विभागांनी मागणी केलेला निधी मंजूर करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०७-०६-२०१८) :** (१), (२) व (३) जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०१८-१९ चा प्रारुप आराखडा तयार करण्याकरीता शासनाने यवतमाळ जिल्ह्याकरीता रुपये २१९.०४ कोटी इतकी आर्थिक मर्यादा निश्चित केली असताना जिल्ह्यातील विविध विभाग/यंत्रणांकडून एकूण रुपये ९७१.६८ कोटी चे प्रस्ताव जिल्हा नियोजन समिती, यवतमाळ यांचेकडे विचारार्थ सादर करण्यात आले होते. तुलनात्मक मागणी व प्राधान्यक्रमाचा

विचार करुन प्रस्ताव राज्यस्तरीय बैठकीमध्ये सादर केले असता अंतिमत: रुपये २४६.९७ कोटी यवतमाळ जिल्ह्याकरीता जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०१८-१९ अंतर्गत मंजूर करण्यात आले आहेत.

---

## जलांद्री (ता.आर्णी, जि.यवतमाळ) जोड रस्त्याकरीता वन विभागाने जमीन देणेबाबत

**(४०) ४०४४३ (०४-०४-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर** : सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जलांद्री (ता.आर्णी, जि.यवतमाळ) येथे अस्वलाच्या हल्ल्यात एक व्यक्ती मृत झाली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जलांद्री गावाकडे जाण्यासाठी वन विभागाच्या हद्दीतून ग्रामस्थांना जावे लागते, हे ही खरे आहे काय,

(३) तसेच, जिल्हा परिषद बांधकाम विभागाने सदर रस्त्याकरीता वन विभागाकडे जमिनीची मागणी केली होती परंतु वन विभागाकडून जलांद्री जोड रस्त्याकरीता जमीन देण्यास टाळाटाळ करण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन वन्य प्राण्यांकडून ग्रामस्थांची प्राणहानी होऊ नये म्हणून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२४-०५-२०१८)** : (१) जलांद्री या गावामध्ये दिनांक २१/०१/२०१८ रोजी अस्वल या वन्यप्राण्यांच्या हल्ल्यात श्री.जग्गु यशवंत आडे या व्यक्तीचा मृत्यू झाला आहे.

(२) हे खरे आहे.

(३) व (४) हे खरे नाही. जिल्हा परिषद बांधकाम विभागाने सदर रस्त्याकरीता वन विभागास जमिनीची मागणी केलेली नाही.

मानव-वन्यप्राणी संघर्ष टाळण्याच्यादृष्टीने खालीलप्रमाणे उपाययोजना

करण्यात येतात.

- वनक्षेत्रात नियमितपणे वन अधिकारी व कर्मचारी यांच्यामार्फत गस्त करण्यात येते.
- ग्रमस्थांचे वनातील अवलंबत्व कमी करण्याच्यादृष्टीने जलांद्री गावातील लाभार्थीना LPG गॅसचे वाटप करण्याकरीता निधी वितरीत करण्यात आले आहे.
- ग्रामस्थांमध्ये वन्य प्राण्यांबाबत जनजागृती करण्यात येऊन संयुक्त वनव्यवस्थापन समितीमार्फत गावकऱ्यांना मार्गदर्शन करण्यात येते.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे भोगाव (बुद्रुक) येलंगेवाडी (ता.पोलादपूर, जि.रायगड) येथे नळ पाणीपुरवठा योजना मंजूर करण्याबाबत

**(४१) ४०६४१ (०५-०४-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे भोगाव (बुद्रुक) येलंगेवाडी (ता.पोलादपूर, जि.रायगड) येथे नळपाणीपुरवठा योजना मंजूर होणेबाबत लोकप्रतिनिधींनी मा.पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री यांना दिनांक १२ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदन दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त निवेदनानुसार शासनाने चौकशी करुन मौजे भोगाव येथे नळ पाणीपुरवठा योजना मंजूर करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, त्याचे स्वरुप काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (१७-०७-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) मौजे भोगाव (बुद्रुक) येलंगेवाडी, ता.पोलादपूर, जि.रायगड या वाडीस झऱ्यावर आधारीत पाणीपुरवठा योजना होती. मार्च ते मे या कालावधीत निर्माण होणाऱ्या पाणी टंचाईवर मात करण्यासाठी जलस्वराज्य टप्पा

क्र. १ अंतर्गत पाऊस पाणी संकलनाची योजना राबविण्यात आली आहे. या योजनेतून माहे मार्च ते मे या पाणी टंचाई कालावधीत २० लिटर प्रती माणशी प्रती दिनी पाणीपुरवठा करण्यात येतो.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मु.पो.वाकी बु.शिवाजीनगर (ता.पोलादपूर, जि.रायगड) गावातील नदीवर कोल्हापूरी पध्दतीचा बंधारा बांधण्याबाबत

**(४२) ४०६४३ (०४-०४-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मु.पो.वाकी बु.शिवाजीनगर (ता.पोलादपूर, जि.रायगड) गावातील नदीवर कोल्हापूरी पध्दतीचा बंधारा बांधण्याबाबत लोकप्रतिनिधींनी मा.जलसंधारण मंत्री यांना दिनांक १२ डिसेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने निवेदनानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे व त्यांचे स्वरुप काय आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०७-०६-२०१८) :** (१) होय.
(२) या संदर्भात उप अभियंता, लघुसिंचन जलसंधारण उपविभाग माणगाव, जि.रायगड यांनी प्राथमिक सर्वेक्षण केले असून मु.पो.वाकी बु.शिवाजीनगर, ता.महाड येथे प्रस्तावित सिमेंट नाला बांध प्राथमिक अंदाजपत्रकीय किंमतीनुसार आर्थिक मापदंडात बसत नाही. सदर बंधाऱ्याचे सविस्तर अंदाजपत्रक तयार करण्याचे काम उपविभाग माणगांव, जि.रायगड यांच्याकडे प्रगतीपथावर आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## चंद्रपूर जिल्ह्यातील ताडोबा अंधारी व्याघ्र अभयारण्याच्या

## प्रवेश शुल्कात वाढ करण्याबाबत

**(४३) ४०७६१ (०४-०४-२०१८). श्री.हेमंत टकले, श्री.विक्रम काळे, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.ख्वाजा बेग, श्री.रामराव वडकुते, ॲड.निरंजन डावखरे, श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चंद्रपूर जिल्ह्यातील प्रमुख व्याघ्र प्रकल्प, ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्पाची ऑनलाईन नोंदणी प्रवेशपत्रिकेत आणि शनिवार-रविवारच्या प्रवेश शुल्कात दिनांक १ फेब्रुवारी, २०१८ रोजीपासून वाढ करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ही प्रवेश शुल्क दरवाढ करण्याची कारणे काय व त्याचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, या दरवाढीमुळे ताडोबा व्याघ्र प्रकल्पाला भेट देणाऱ्या पर्यटकांच्या तसेच राज्यातील अनेक शाळा, महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना शुल्क परवडणार नसल्याने भेट देणाऱ्या पर्यटकांच्या संख्येमध्ये घट होणार आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने प्रस्तावित केलेली दरवाढ कमी करण्याचेदृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२४-०५-२०१८) :** (१) ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्पाची ऑनलाईन नोंदणी प्रवेश पत्रिकेत शनिवार व रविवारच्या प्रवेश शुल्कात दिनांक ०१ फेब्रुवारी, २०१८ पासून वाढ करण्यात आली आहे. तथापि इतर दिवसांच्या प्रवेश शुल्कात वाढ करण्यात आली नाही.

(२) शनिवार-रविवारी येणाऱ्या पर्यटकांची वाढ व प्रवेद्वारातून सोडण्यात येणाऱ्या वाहनांची संख्या बघता पर्यटन सुरळीतपणे चालवण्याकरीता प्रवेश शुल्कात वाढ करण्यात आली आहे.

(३) हे खरे नाही.

चंद्रपूर जिल्ह्यातील शाळांमधील मुलांना “चला माझ्या ताडोबाला” या

शिर्षाखाली ताडोबाची मोफत फेरी करविण्यात येते. तसेच मागणी नुसार वृध्दाश्रमातील वृध्दांना, अनाथालयातील मुलांना, दिव्यांगांना ताडोबाची मोफत फेरी करविण्यात येते.

तसेच जिल्हा बाहेरुन येणाऱ्या शाळा व महाविद्यालयातील विद्यार्थ्यांना सवलतीच्या दरात प्रवेश शुल्क आकारण्यात येते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## उरण (जि.रायगड) येथील वीज कंपनीस गॅसचा पुरवठा अपुरा होत असल्याबाबत

**(४४) ४०८४९ (०५-०४-२०१८). श्री.बाळाराम पाटील** : सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील पर्यावरणपूरक वीज प्रकल्प अशी ओळख असलेला महानिर्मितीचा उरण (जि.रायगड) येथील गॅसवर चालणारा वीज प्रकल्प गेल कंपनीकडून गॅसचा अपुरा पुरवठा होत असल्याने बंद पडण्याच्या मार्गावर आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर वीज प्रकल्पास गॅस पुरवठा करण्याबाबत जीएआयएल कंपनी बरोबर करार झाला असतानाही गॅसचा अपुरा पुरवठा होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर वीज प्रकल्पास नियमित योग्य गॅस पुरवठ्याबाबत शासनस्तरावर काय उपाययोजना करण्यात आल्या वा येत आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१२-०६-२०१८)** : (१) हे खरे नाही.

(२) गेल कंपनी बरोबर महानिर्मितीचा ३.५ द.ल.घ.मी. प्रतिदिन असा गॅस पुरवठ्याबाबतचा करार दिनांक ३१/१२/२०१५ रोजी झालेला आहे. सन २०१४-१५ करीता सरासरी प्रति दिन २.३०५ द.ल.घ.मी. गॅसच्या उपलब्धतेनुसार ३४७७.६३९ द.ल. युनिट्स वीज निर्मिती, सन २०१५-१६ करीता

सरासरी प्रति दिन १.९६५ द.ल.घ.मी. गॅसच्या उपलब्धतेनुसार २८८८.१२८ द.ल. युनिट्स वीज निर्मिती आणि सन २०१६-१७ करीता सरासरी प्रति दिन २.२७८ द.ल.घ.मी. गॅसच्या उपलब्धतेनुसार ३२९५.०७३ द.ल. युनिट्स याप्रमाणे महानिर्मिती कंपनीने वीज निर्मिती केली आहे.

(३) महानिर्मितीच्या उरण वायू वीज प्रकल्पास मिळत असलेल्या गॅसच्या पुरवठ्यात असलेली तूट भरुन काढण्यासाठी दिनांक १८ जानेवारी, २०१७ रोजी स्पॉट गॅस पुरवठ्याबाबत गेल कंपनीसोबत करार करण्यात आलेला आहे.

---

## वडशेत वावे (ता.श्रीवर्धन, जि.रायगड) येथे बांधण्यात येत असलेल्या धरणाबाबत

**(४५) ४०८६६ (०४-०४-२०१८). श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वडशेत वावे (ता.श्रीवर्धन, जि.रायगड) येथे शासनामार्फत धरण बांधण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर धरण बांधण्यासाठी परिसरातील शेतजमीन संपादित केली असून धरणाचे काम बंद आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने संपादित केलेल्या शेतकऱ्यांच्या शेतजमिनीला चालू निकषाप्रमाणे नुकसान भरपाई देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१४-०६-२०१८) :** (१) होय.

(२) होय.

धरणाच्या बुडीत क्षेत्रातील एकूण ६.०२.८ हेक्टर वन जमिन संपादित न झाल्यामुळे धरणाचे काम बंद आहे.

(३) प्रकल्पाकरीता आवश्यक एकूण ७५.४८.२ हेक्टर जमिनीपैकी ३३.६६.९

हेक्टर संपादित केलेल्या खाजगी जमिनीचा भूसंपादन निवाडा विशेष भूसंपादन अधिकारी यांनी मंजूर केला असून मोबदला वाटप दिनांक २७/४/२०१० ते ७/५/२०१० या दरम्यान केला आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील अनुसूचित जाती व जमातीसाठी विशेष विकास निधी अधिनियम करण्याबाबत

**(४६) ४०८७७ (०५-०४-२०१८). श्री.आनंद ठाकूर, श्री.प्रकाश गजभिये, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) तेलंगणा राज्याच्या धर्तीवर राज्यात अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या विकासासाठी विशेष विकास निधी अधिनियम करण्यासाठी अनुसूचित जाती व जमातीच्या लोकप्रतिनिधींनी दिनांक २० डिसेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास मा.मुख्यमंत्री यांना प्रत्यक्ष भेटून निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर निवेदनावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१९-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) तेलंगणा राज्याच्या धर्तीवर राज्यात अनुसूचित जाती घटक कार्यक्रमासंदर्भात “महाराष्ट्र अनुसूचित जाती घटक कार्यक्रम (नियोजन, वाटप आणि वित्तीय साधनसंपत्तीचा वापर) अधिनियम, २०१७” तयार करून वित्त, विधी व न्याय विभागाचे अभिप्राय विचारात घेऊन प्रारूप अधिनियम मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीसमोर सादर करण्याची कार्यवाही सुरू आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात तंबाखूजन्य पदार्थाची विक्री रोखण्याबाबत

**(४७) ४०९३५ (०५-०४-२०१८). श्री.सतेज उर्फ बंटी पाटील :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात सध्या १५ ते १७ वयोगटातील मुलांमध्ये तंबाखूजन्य पदार्थाच्या वापरामध्ये वाढ होत असून याचा युवा पिढीच्या आरोग्यावर दुष्परिणाम होत असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन तंबाखूजन्य पदार्थाची होत असलेली विक्री थांबविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (१४-०६-२०१८) :** (१) दै. लोकमत या वृत्तपत्रामध्ये दिनांक १६/०१/२०१८ मध्ये या आशयाची बातमी प्रसिध्द झाल्याचे अन्न व औषध प्रशासनाच्या निदर्शनास आले आहे.
(२) सन २०१२ पासून आतापर्यंत प्रत्येक वर्षी गुटखा, पानमसाला, स्वादिष्ट/सुगंधित तंबाखू, स्वादिष्ट/सुगंधित सुपारी, खर्रा इत्यादी पदार्थाच्या विक्री, साठवणूक व वितरणावर अन्न व औषध प्रशासनाने प्रतिबंध घातला आहे.

तसेच तंबाखू व तंबाखूजन्य पदार्थ व अन्न पदार्थ एकाच ठिकाणाहून/दुकानातून विक्रीस प्रतिबंध घालण्याचे आदेश महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग ४ क, दिनांक १५/०१/२०१८ नुसार पारित करण्यात आले आहेत. सदर प्रकरणी अन्न व औषध प्रशासनामार्फत जनजागृती करण्याचे तसेच ग्रामीण भागासह विविध ठिकाणी सदर आदेशास व्यापक प्रसिध्दी देण्याचे कार्य चालू करण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शिराढोण (जि.नांदेड) येथील कालवा निरीक्षक

## चौकीची दूरवस्था झाल्याबाबत

**(४८) ४०९४० (०४-०४-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शिराढोण (जि.नांदेड) येथे लाखो रुपये खर्च करुन कालवा निरीक्षक चौकी बांधण्यात आली असून या चौकीची दूरवस्था झाली असून ती मोडकळीस आली असल्यामुळे त्याची दुरुस्ती करण्यासाठी स्थानिक लोकप्रतिनिधी यांनी संबंधिताकडे वारंवार मागणी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन चौकीची दुरुस्ती करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१४-०६-२०१८) :** (१) हे खरे नाही. कालवा निरीक्षक चौकीचा एक कक्ष सुस्थितीत असून दुसरा कक्ष नादुरुस्त आहे. सदर कक्ष निधी उपलब्धतेनुसार दुरुस्त करण्याचे नियोजन आहे.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## १८ डिसेंबर हा दिवस अल्पसंख्यांक दिवस म्हणून साजरा करण्याबाबत

**(४९) ४१०३८ (०५-०४-२०१८). श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **अल्पसंख्यांक विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) संयुक्त राष्ट्र संघटनेने दिनांक १८ डिसेंबर, १९९२ रोजी राष्ट्रीय, वंशिक, धार्मिक आणि भाषिक अल्पसंख्यांकांच्या हक्काचा जाहिरनामा स्वीकृत करुन प्रस्तूत केला असून, त्यानुसार अल्पसंख्यांकांना त्यांची संस्कृती, भाषा, धर्म, परंपरा इत्यादींचे संवर्धन करण्यात यावे तसेच याबाबतचे वैशिष्ट यांची प्रभावीपणे अभिव्यक्ती करता यावी, यादृष्टीने प्रयत्न करण्याबाबत राष्ट्रीय अल्पसंख्यांक आयोगाने सूचना दिल्या असून त्यानुसार १८ डिसेंबर हा दिवस अल्पसंख्यांक हक्क दिवस, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोगामार्फत

राबविण्यात येतो, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्याच्या शिक्षण विभागाच्या उदासिन वृत्तीमुळे १८ डिसेंबर हा दिवस अल्पसंख्यांक हक्क दिन म्हणून साजरा करण्याबाबतच्या सूचना शिक्षण विभागाने दिनांक १६ डिसेंबर, २०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये इतक्या अत्यल्प वेळात शाळांना मिळाल्याने अल्पसंख्यांक हक्क दिन साजरा करण्याकरीता, भिंतीपत्र स्पर्धा, वक्तृत्व स्पर्धा, निबंध स्पर्धा या कार्यक्रमातील विजेत्यांना पारितोषिके व्याख्यानमाला, चर्चासत्र, परिसंवाद इत्यादी आयोजित करण्यास वेळच मिळाला नसल्याने अल्पसंख्यांक हक्क दिन साजरा करता आला नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुसार अल्पसंख्यांक हक्क दिवस साजरा करण्याबाबतच्या सूचना इतक्या उशीरा पाठविणाऱ्या संबंधितांविरुध्द कारवाई करुन अशा प्रकारे पुनरावृत्ती होऊ नये यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०८-२०१८)** : (१) संयुक्त राष्ट्र संघटनेने दिनांक १८ डिसेंबर, १९९२ रोजी राष्ट्रीय, वांशिक, धार्मिक आणि भाषिक अल्पसंख्याकांच्या हक्काचा जाहीरनामा स्वीकृत करुन प्रस्तृत केला आहे. त्यानुसार अल्पसंख्याक नागरिकांना त्यांची संस्कृती, भाषा, धर्म, परंपरा इत्यादींचे संवर्धन करता यावे, तसेच याबाबतचे वैशिष्ट्यांची प्रभावीपणे अभिव्यक्ती करता यावी यादृष्टीने प्रयत्न करण्याबाबत राष्ट्रीय अल्पसंख्याक आयोगाने सूचना दिल्या असून दिनांक १८ डिसेंबर हा दिवस “अल्पसंख्याक हक्क दिवस” महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगामार्फत राबविण्यात येतो. याबाबत अल्पसंख्याक विकास विभागाने शासन परिपत्रक क्र.अविवि-२०१६/प्र.क्र.१८७/का.८, दिनांक १४ नोव्हेंबर, २०१७ अन्वये सूचना निर्गमित केल्या आहेत.

(२) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोगाने दिनांक ५ डिसेंबर, २०१७ च्या पत्रान्वये सर्व जिल्हाधिकारी व शिक्षणाधिकारी (माध्यमिक) यांना सूचित केले आहे. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाकडून याबाबत कोणतेही परिपत्रक

निर्गमित करण्यात आलेले नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जायकवाडी धरणातील पाण्याची तुट भरुन काढण्यासाठी पश्चिम वाहिन्या नद्यांचे पाणी गोदावरी खोऱ्यात वळविण्याबाबत

**(५०) ४१०७१ (०४-०४-२०१८). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मराठवाड्यातील गोदावरी नदीवर बांधलेल्या जायकवाडी धरणातील पाण्याची तुट भरुन काढण्यासाठी शासनाने पश्चिम वाहिन्या नद्यांचे पाणी गोदावरी खोऱ्यात वळविण्यासाठी सहा महिन्यात निर्णय घेण्याच्या सूचना मा.उच्च न्यायालयाच्या असूनही शासन कार्यवाही करीत नसल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त कारणास्तव जायकवाडी धरणाची तुट भरुन निघत नसल्याने मराठवाड्यातील पाण्याचा प्रश्न दिवसेदिवस बिकट होत आहे यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (२०-०६-२०१८) :** (१) नाही.

तथापी जनहीत याचिका क्र. १७३/२०१३ निर्णयाच्या अनुषंगाने पश्चिम वाहिनी नद्यांचे पाणी पूर्वेकडे वळविणेबाबत ऑगस्ट २००१ च्या अहवालातील शिफारशी केल्याप्रमाणे निर्णय घेण्यासाठी ६ महिने व २३ प्रवाही वळण योजनेची कार्यवाही करणेसाठी १ वर्षाची कालमर्यादा मा.उच्च न्यायालयाने निर्णयाद्वारे विहित केलेली आहे.
(२) पश्चिम वाहिनी दमणगंगा, पार, वैतरणा, उल्हास खोऱ्यातून पूर्वेकडे गोदावरी खोऱ्यात पाणी वळविण्यासाठी २३ प्रवाही वळण योजनांची कामे विविध टप्प्यावर प्रगतीपथावर आहेत. या २३ प्रवाही वळण योजनांपेकी १२ प्रवाही वळण योजना पूर्ण झालेल्या असून ५ योजना बांधकामाधीन आहेत. ३ योजनांना शासनाची तत्वत: मान्यता आवश्यक आहे. २ योजनांना

प्र.मा.आवश्यक आहे. १ योजना प्राथमिकस्तरावर (भूसंपादन) आहे.

या शिवाय पार खोऱ्यातील पाणी उपसाव्दारे गोदावरी खोऱ्यात वळविण्यासाठी उपसा जोड योजना क्र.३ व ४ ता.पेठ जि.नाशिक या योजना प्रस्तावित असून सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी सर्वेक्षण व अन्वेषण प्रगतीपथावर आहे.

तसेच दमणगंगा (एकदरे) - गोदावरी व वैतरणा - कडवा - देवनदी राज्यांतर्गत नदीजोड योजनांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणेबाबत शासनस्तरावरुन राष्ट्रीय जलविकास अभिकरणास कळविण्यात आले आहे व राष्ट्रीय जलविकास अभिकरणामार्फत प्रकल्प अहवालाबाबतची कार्यवाही प्रगतीत आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.